**आलापल्ली वनविभागा अंतर्गत अहेरी वनपरिक्षेत्रातील हनुमान टेकडी सौंदर्यकरण करण्याच्या कामाचे दोन वेगवेगळे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.वनबां-२०१८/प्र.क्र.३२७/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- १५ नोव्हेंबर, २०१८**

वाचा :- (१)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४/वअं/लेखा/प्र.क्र.३१/४८५/२०१७-१८,दिनांक ०३.०९.२०१८

प्रस्तावना:-

आलापल्ली वनविभागाअंतर्गत अहेरी वनपरिक्षेत्रातील हनुमान टेकडी सौंदर्यकरण करण्याच्या कामाचे रु.१७४,६५,६५५/- इतक्या रकमेची दोन अंदाजपत्रके शाखा अभियंता, वन अभियंता कार्यालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी तयार केली असून, वनपरिक्षेत्र अधिकारी, अहेरी, उपवन संरक्षक, आलापल्ली विभाग, आलापल्ली यांनी साक्षांकित केली आहेत. सदर अंदाजपत्रकांना वन अभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान केलेली आहे.

संदर्भाधिन पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता मिळणेसाठी प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने आलापल्ली वनविभागाअंतर्गत अहेरी वनपरिक्षेत्रातील हनुमान टेकडी सौंदर्यकरण करण्याच्या कामाचे रु.१७४,६५,६५५/- इतक्या रकमेच्या दोन अंदाजपत्रकास छाननीअंती सार्वजनिक बांधकाम विभागाने सदरचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून भागवावा या अटीच्या अधिन राहून सहमती दिलेली आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

आलापल्ली वनविभागाअंतर्गत अहेरी वनपरिक्षेत्रातील हनुमान टेकडी सौंदर्यकरण करण्याच्या कामाचे रु.१७४,६५,६५५/- इतक्या रकमेच्या दोन अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस व सोबत जोडलेल्या “प्रपत्र-अ” मध्ये नमूद केल्याप्रमाणे आणि सदरचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून भागवावा या अटीच्या अधिन राहून तसेच खालील अटींच्या अधीन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

१. सदर बांधकामाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
५. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
६. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११६१६४०३९६८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.11.16 16:47:39 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) गडचिरोली
४. उपवनसंरक्षक (प्रा.) आलापल्ली वनविभाग, आलापल्ली.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

**“प्रपत्र-अ”**

## शासन निर्णय क्र.वनबां-२०१८/प्र.क्र.३२७/फ-९, दिनांक १५ नोव्हेंबर, २०१८ सोबतचे प्रपत्र-अ

NAME OF WORK :- Construction of Nature Interpretation Centre in Comp. No.191 at Aheri in Aheri Range in Allapalli Division in Gadchiroli Circle.

A) Plinth area of Nature Interpretation Centre -30,000.00 Lit’s

RECAPUTILATION SHEET

| **Sr.No.** | Items | **Cost Rs.** |
|---|---|---|
| A | For Nature Interpretation Centre | |
| i | Plinth Area of Nature Interpretation Centre – 93.87 Sqmt<br>93.87 x 20,000 =18,77,400.00<br>Rate of Construction – 20,000 Rs/Sqmt (Excluting 30% For Tribal & Naxal Area) | 18,77,400.00 |
| ii | Add 30% For Tribal & Naxal Area | 5,63,220.00 |
| | Total (A) :- | 24,40,620.00 |
| | Add for AC works & Minor Modifications | 1,00,000.00 |
| | Add for Carpentry with furniture work | 2,00,000.00 |
| B | Add 9% Electrification | 2,19,656.00 |
| | Add 12% For GST | 2,92,874.00 |
| | Add 4% for Contingencies | 97,625.00 |
| | Total (B) :- | 9,10,155.00 |
| | **Total Cost of Pagoda in Rs. (A) + (B) :-** | **33,50,775.00** |
| | **Say Rs. ;-** | **33,50,775.00** |

NAME OF WORK :- Construction of RCC Protection Wall in Comp. No.191 at Aheri in Aheri Range in Allapalli Division in Gadchiroli Circle.

A) Length of RCC Compound Wall = 1300.00 Rmt.
B) Height of RCC Compound Wall =1.50 mt.
C) Wall thick of RCC Compound Wall = 10 Cm.

RECAPUTILATION SHEET

| **Sr.No.** | Items | **Cost Rs.** |
|---|---|---|
| A | For RCC Compound Wall | |
| i | Length of RCC Compound Wall = 1300.00 Rmt.<br>1300.00 x 7200= 93,60,000.00<br>Rate of Construction -7200.00 Rs/Rmt (Excluding 30% for Tribal & Naxal Area) | 93,60,000.00 |
| ii | Add 30% For Tribal & Naxal Area | 28,08,000.00 |
| | **Total (A) :-** | **1,21,68,000.00** |
| B | Add 12% For GST | 14,60,160.00 |
| | Add 4% for Contingencies | 4,86,720.00 |
| | **Total (B) :-** | 19,46,880.00 |
| | **Total Cost Rs. (A) + (B) :-** | **1,41,14,880.00** |
| | **Say Rs.;-** | **1,41,14,880.00** |

*****************